जिल्हा रुग्णालय जालना, येथील मुख्य इमारती दुरुस्ती, निवासस्थान दुरुस्ती, सी.सी.रस्ता, नवीन आय.सी.यु, आणि नवीन शवविच्छेदन कक्ष बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०२१/प्र.क्र.११८/आरोग्य ४**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १० डिसेंबर, २०२१.

**वाचा :**

1) **सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये राज्यस्तर मुंबई यांचे पत्र क्रमांक : संआसे/कक्ष-३ /टे-६/जिरुजालनामुइवनिवादुरुस्ती/७७७१-७२/२१, दिनांक ०६.०५.२०२१.**

**प्रस्तावना :**

जिल्हा रुग्णालय जालना, येथील मुख्य इमारती दुरुस्ती, निवासस्थान दुरुस्ती, सी.सी.रस्ता, नवीन आय.सी.यु, आणि नवीन शवविच्छेदन कक्ष बांधकामाच्या रु. २२.१४ कोटीच्या प्राथमिक अंदाजपत्रक आराखडयांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

२. जिल्हा रुग्णालय जालना, सं.न.४८८ येथील मुख्य इमारती दुरुस्ती, निवासस्थान दुरुस्ती, सी.सी.रस्ता, नवीन आय.सी.यु, आणि नवीन शवविच्छेदन कक्ष बांधकामाचे अंदाजपत्रक उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग-१, जालना यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना; अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम. मंडळ औरंगाबाद; मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद तसेच जिल्हा शल्य चिकित्सक, जालना यांनी साक्षांकण केले आहे. तसेच शासन निर्णय दि.२८.२.२०२० अन्वये जिल्हा रुग्णालय, जालना येथील टाईप १ व टाईप २ निवासस्थानांची दुरुस्ती इमारतीची व परिसरातील ड्रेनेज व अंतर्गत रस्ते यांची

दुरुस्ती इत्यादी कामास रु.८.७२ कोटी इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापिकामाच्या वावामध्ये अंतर्गत रस्ते, इमारतीच्या बांधकामाची वाढ झाल्याने, त्यानुसार एकूण रु. २२.१४ कोटी इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना खालील प्रमाणे त्या खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अक्र | बाब | मूळ प्रशासकीय मान्यता | सुधारीत प्रशासकीय | फरक |
|---|---|---|---|---|
| अ. | १. मुख्य इमारत दुरुस्ती | २०७.९९ | ६३२.८० | ४२४.८१ |
| | २. निवासस्थान दुरुस्ती | २३७.१३ | ४८४.६६ | २४७.५३ |
| | ३. सी.सी.रस्ता | ४५.२० | १९५.३१ | १५०.११ |
| | ४. नवीन आय.सी.यु. | ११६.२३ | १९९.६१ | ८३.३८ |
| | ५. नवीन शवविच्छेदन कक्ष बांधकाम | ७७.९८ | १००.७९ | २२.८१ |
| | ६. Royalty and testing | ३.४६ | ८.८१ | ५.३५ |
| | ७. Contingency Charges | २८.८९ | ६४.५३ | ३५.६४ |
| | ८. Labour insurance (०.५%) | ३.४२ | ८.०७ | ४.६५ |
| | ९. Centange Charges (५%) | ३६.११ | ८०.६६ | ४४.५५ |
| | १०. GST १२% | ८२.१४ | १९३.५८ | १११.४४ |
| | **नवीन बाबी** | | | |
| | EIRL | .... | ७३.६६ | ७३.६६ |
| | Architect २% of work portion | .... | १०.४४ | १०.४४ |
| | **एकूण अ** | **८३८.५५** | **२०५२.९२** | **१२१४.३७** |
| ब. | **विदयुत** | | | |
| | १. मुळ बाबी | ३४.२२ | १६१.३२ | १२७.१० |
| | **एकूण ब** | **३४.२२** | **१६१.३२** | **१२७.१०** |
| क. | पाणी पुरवठा | --- | --- | --- |
| | **एकूण क** | **---** | **---** | **---** |
| | **एकूण अ,ब,क.** | **८७२.७७** | **२२१४.२४** | **१३४१.४७** |

<u>**अटी व शर्ती**</u> :-

१) कामासाठी निविदा मागविण्यापूर्वी सदर कामास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) बांधकामासाठी उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययामधून सदर कामास निधी उपलब्ध करुन देण्याच्या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर कामाची ई-निविदा करतांना कामाचे तुकडे न करता एकत्रित निविदा करण्यात यावी.

४) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

५) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाच्या किंमतीमध्ये अनावश्यक वाढ करण्यात येवू नये.

६) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्यात्या-क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल.

७) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

८) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. उपरोक्त १ ते ८ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील.

४. १०० खाटांचे महिला रुग्णालय वर्धा येथील मुख्य इमारत बांधकामावरील खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, ११०- रुग्णालय व दवाखाने, (१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१०००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात यावा. तसेच कामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये तसेच दिनांक २९.११.२०२१ रोजी झालेल्या सचिव समितीच्या मान्यतेनुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारीत संदर्भ क्र.अनौस-१३४/२०२१/इमा-२ दि.२१.१०.२०२१ अन्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२९१७३८५०६११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2021.12.10 13:35:19 +05'30'

**( रो.दी. कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुगणालय राज्यस्तर), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, औरंगाबाद
६. जिल्हा शल्य चिकित्सक जिल्हा रुग्णालय, जालना.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. जालना.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३).